**युनिक आयडेंटिटी ॲथॉरिटी ऑफ इंडिया यांच्या प्रतिनिधीचा माहिती तंत्रज्ञान विषयक उच्चाधिकार समिती तसेच प्रकल्प अंमलबजावणी समिती मध्ये सदस्य म्हणून नियुक्ती करण्याबाबत -**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
मातंसं-२०१०/प्र.क्र. ४८/का-३९
दिनांक :- २९-६-२०१०.

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र. सीओएम-१०९८/प्र.क्र.२१२/९८/३९, दि. ५ ऑक्टोबर २००१.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मातंसं /नस्ती२०१०/प्र.क्र.४८/३९, दि. ३ एप्रिल, २०१०.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि. २९.१०.२००१.

**प्रस्तावना :**

केंद्र सरकारने नियोजन आयोगाच्या अधिपत्याखाली भारतीय नागरिकांना ओळख क्रमांक देण्यासाठी युनिक आयडेंटिटी ॲथॉरिटी ऑफ इंडिया या प्राधिकरणाची स्थापना केली आहे. प्राधिकरणामार्फत राबविल्या जाणाऱ्या प्रकल्पांची राज्यात प्रभावी अंमलबजावणी व्हावी म्हणून या प्रकल्पावर देखरेख करण्यासाठी मा.मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उच्चाधिकार उप समिती शासन निर्णय क्रमांक मातंसं/२०१०/प्र.क्र.४८/३९, दिनांक ३ एप्रिल २०१० अन्वये स्थापन करण्यात आली आहे. तसेच प्राधिकरणामार्फत राबविल्या जाणाऱ्या प्रकल्पावर देखरेख व संनियंत्रण करण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समिती दिनांक ३ एप्रिल २०१० च्या शासन निर्णयाअन्वये स्थापन करण्यात आलेली आहे.

राज्य शासनाने माहिती तंत्रज्ञान विषयक कृती कार्यक्रम, माहिती तंत्रज्ञान याविषयी धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समितीची स्थापना केलेली आहे. तसेच मंत्रालयीन विभागाच्या सचिवांच्या अध्यक्षतेखाली रु.५ कोटी पर्यंतच्या माहिती तंत्रज्ञान प्रकल्पाचे मान्यतेसाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती कार्यान्वित आहेत. रु. ५.०० कोटीपेक्षा अधिक प्रकल्पांचे पुनरावलोकन व मान्यतेसाठीचे प्रस्ताव उच्चाधिकार समितीकडे येतात.

२. प्रकल्प अंमलबजावणी समिती आणि उच्चाधिकार समितीमध्ये माहिती तंत्रज्ञान, नियोजन, वित्त यासारख्या महत्वाच्या विभागातील सभासदांचा तसेच एन आय सी सारख्या बाह्य संस्थेतील तांत्रिक तज्ञांचा समावेश करण्यात आलेला आहे.

३. केंद्र सरकारने नियोजन आयोगाच्या अधिपत्याखाली युनिक आयडेंटिटी ॲथॉरिटी या प्राधिकरणाची स्थापना केली आहे. भारतीय नागरिकांना ओळखक्रमांक देण्यासाठी आवश्यक त्या तांत्रिक व विधिविषयक पायाभूत सोयी सुविधा निर्माण करणे व त्याची अंमलबजावणी करणे हे प्रमुख काम आहे. प्रत्येक नागरिकास ओळखक्रमांक दिल्यास त्याची पडताळणी ऑनलाईनव्दारे कमी खर्चामध्ये करता येणार असून बोगस ओळखपत्रांचे प्रमाण लक्षणियरित्या कमी होणार आहे.

४. युनीक आयडेंटिटी ऑथॉरिटी ऑफ इंडिया यांच्यामार्फत राबविण्यात येत असलेला प्रकल्प व राज्य शासनाच्या विविध विभागांमार्फत राबविण्यात येत असलेल्या नागरिक/उपभोक्ता यांना द्यावयाच्या बायोमॅट्रिक



पुढे/प.

ओळखपत्र यांची सुसंगतरित्या सांगड घातल्यास एकाच कामाची पुनरावृत्ती टाळता येऊन खर्चाचे प्रमाण कमी होईल. जेणेकरुन राज्य शासनाच्या विभागांचे प्रयत्न हे युनिक आयडी ऑथॉन्टीकेशन ऑथॉरिटी ऑफ इंडिया यांच्याशी सुसंगत असतील व कामाची पुनरावृत्ती होणार नाही. या अनुषंगाने माहिती तंत्रज्ञान विषयक उच्चाधिकार समिती तसेच विभागनिहाय प्रकल्प अंमलजबावणी समितीमध्ये युनीक आयडेंटिटी ऑथॉरिटी ऑफ इंडियाच्या प्रतिनिधींचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील माहिती तंत्रज्ञानाच्या प्रकल्पासाठीची उच्चाधिकार समिती तसेच शासनाच्या सर्व विभागांच्या माहिती तंत्रज्ञान विषयक प्रकल्प अंमलबजावणी समितीमध्ये युनीक आयडेंटिटी ऑथॉरिटी ऑफ इंडिया यांच्या प्रतिनिधींची सदस्य म्हणून नेमणुक करण्यात येत आहे.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आली असुन त्याचा संगणक संकेतांक २०१००६२९१६४५२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ. अजय भूषण पांडेय )
**प्रधान सचिव (मा तं)**

**प्रति,**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
युनीक आयडेंटिटी ऑथॉरिटी ऑफ इंडिया
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त, /सर्व जिल्हाधिकारी,/ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई / लेखाकोष भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती (२ प्रती).

***************